आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात महाराष्ट्र राज्य आदिवासी विकास महामंडळ, नाशिक यांना कार्यालयीन खर्चासाठी निधी वितरण (लेखाशिर्ष २४२५ ०८५३)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२३/ प्र.क्र.०२/ कार्यासन-६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : २८ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३, दि.०८.१२.२०२३, दि.०५.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४.
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक यांचे पत्र क्र.आविमं/लेखा-३१/२०२३-२४/वेतनेतर निधी मा.५९२४/२०२३, दि.११.१२.२०२३.
३) आदिवासी विकास विभाग समक्रमांकित शासन निर्णय दिनांक ०४.०९.२०२३ व दिनांक २२.०२.२०२४.
४) आदिवासी विकास विभाग नस्ती क्र. आविवि-२०२४/प्र.क्र. ०७/कार्या-३.

**प्रस्तावना :-**

आदिवासी विकास विभागाच्या अधिनस्त व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक यांना सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून लेखाशिर्ष २४२५०८५३ अंतर्गत बाब क्र.३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) याखाली रु.१८०.०० लाख इतका निधी वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र.४ अन्वये वित्त विभागास प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रम अंतर्गत मुख्य मागणी क्र.टी-५ मधील महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळाला वित्तिय सहाय्य (लेखाशिर्ष २४२५ ०८५३) या योजनेच्या बाब क्र. ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) यासाठी खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु. लाखात)**

| योजना | लेखाशीर्ष | बाब | सन २०२३-२४ साठी सुधारीत अंदाज | यापूर्वी वितरीत निधी | सदर शा. नि. अन्वये वितरीत येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळाला वित्तिय सहाय्य | २४२५०८५३ | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | ४२०.०० | २४०.०० | १८०.०० |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.१८०.०० लाख (अक्षरी रुपये एक कोटी ऐंशी लाख फक्त) इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक** यांना वितरीत करण्यास हरकत नसावी.

३. वितरीत निधीचा विनियोग करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील शासन परिपत्रकांतील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. सदर शासन निर्णय ई-ऑफीस क्र.७३१९२०, प्रणालीवर वित्त विभागास सादर करण्यात आलेल्या नस्तीस दिलेल्या मान्यतेस अनुसरुन दि.२६.०३.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२११०२६२७४५२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2024.03.28 13:07:23 +05'30'

**( राजेंद्र दे. भवारी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव, आदिवासी विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्यादित, नाशिक.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
६. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. कार्यासन क्र. ३, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.